**अकृषि विद्यापीठांमधील आजीवन अध्ययन व विस्तार विभागातील संचालक, सहायक संचालक व प्रकल्प अधिकारी या शिक्षक सकक्षक पदांना सहाव्या व सातव्या वेतन आयोगाची सुधारित वेतनरसंरचना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१८४/२०/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २५ एप्रिल, २०२३

**संदर्भ:-**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एनजीसी-१२९८/(१७१०९/४४६८)/विशि-४, दि.१८.११.२००४
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.एनजीसी-२००९/(२४३/०९/विशि-१, दि.१२.०८.२००९
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन अधिसूचना क्र.संकीर्ण-२००९/(३२६/०९)/विशि-१, दि.०७.१०.२००९
४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दि.०८.०३.२०१९
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन अधिसूचना (सुधारणा) क्र.२०२०/प्र.क्र.१८४/२०/ विशि-१, दि.०१.०८.२०२२.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम २२ मध्ये संचालक, आजीवन अध्ययन व विस्तार विभागाची तरतुद आहे. सदर पदाची शैक्षणिक अर्हता व वेतनविषयक लाभ विद्यापीठ अनुदान आयोगाने शिफारस केल्याप्रमाणे व राज्य शासनाने स्वीकृत केल्याप्रमाणे आहेत. सदर पदे विद्यापीठ अनुदान आयोगाकडून वेळोवेळी विद्यापीठासाठी मंजूर करण्यात आली असून तद्नंतर त्यांच्या वेतनाचे आर्थिक दायित्व राज्य शासनाने स्वीकारलेले आहे. त्यानंतर शासन निर्णय दि.१८.११.२००४ अन्वये उक्त नमूद पदांना शिक्षकीय पदांप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यात आली होती. सदर पदांना शासन निर्णय दि.१२.०८.२००९ व दि.०८.०३.२०१९ नुसार अनुक्रमे सहाव्या व सातव्या वेतन आयोगाची शिक्षकीय पदांप्रमाणे वेतनश्रेणी लागू झालेली नाही. विद्यापीठांमध्ये आजीवन अध्ययन व विस्तार विभाग कार्यरत असून सदर विभागामध्ये संचालक, सहायक संचालक व प्रकल्प अधिकारी ही शिक्षक समकक्ष पदे आहेत. त्यामुळे सदर पदांना शिक्षकीय पदांप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यासाठी, वित्त विभागाने दिलेल्या सूचनेनुसार, सदर पदे शिक्षकेतर पदांच्या वेतन आयोगाच्या दि.०७.१०.२००९ च्या अधिसूचनेतून, शासन अधिसूचना (सुधारणा) दि.०१.०८.२०२२ अन्वये वगळण्यात आली आहेत. सदर पदांवर कार्यरत कर्मचाऱ्यांना शिक्षकीय पदांप्रमाणे सहाव्या व सातव्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू करणे आवश्यक आहे. त्याबाबतचा प्रस्ताव दि.०५.०४.२०२३ च्या मा. मंत्रिमंडळ बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात

आला होता. मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

१. अकृषि विद्यापीठामधील आजीवन अध्ययन व विस्तार या विभागातील संचालक, सहायक संचालक व प्रकल्प अधिकारी या शिक्षक समकक्ष पदांना शासन निर्णय दि.१२.०८.२००९ व दि.०८.०३.२०१९ मधील तरतुदींप्रमाणे अनुक्रमे सहावा व सातव्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू करण्यास मंजूरी देण्यात देण्यात येत आहे.

| क्र. | पदनाम | असुधारित वेतनश्रेणी (पाचवा वेतन आयोग) | ६ वा वेतन आयोग | ७ वा वेतन आयोग |
|---|---|---|---|---|
| १ | संचालक | १६४००-२२४०० | रू.३७४००-६७००० +रू.१०००० (एजीपी) | रू.१४४२००-२१८२०० (स्तर-१४) |
| २ | सहायक संचालक | १२०००-१८३०० | १५६००-३९१००+ ८००० (एजीपी) (दि.०१.०१.२००६ रोजी सहायक संचालक या पदावर ३ वर्ष पूर्ण होईपर्यंत) रू.३७४००-६७०००+ रू.९००० (एजीपी) (दि.०१.०१.२००६ रोजी रू.१२०००-१८३००/- या विद्यमान वेतनश्रेणीत ३ वर्ष पूर्ण झाल्यावर) | रू.१३१४००-२१७१०० (स्तर-१३ ए) |
| ३ | प्रकल्प अधिकारी | ८०००-१३५०० | रू.१५६००-३९१०० +रू.६००० (एजीपी) | रू.५७७००-१८२४०० (स्तर-१०) |

२. उपरोक्त पदांना सहावा व सातवा वेतन आयोग लागू केल्यामुळे येणाऱ्या सुमारे रू.५,९०,१०,०००/- (अक्षरी रूपये पाच कोटी नव्वद लक्ष दहा हजार) एवढ्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांच्या वेतनाचा खर्च ज्या लेखाशिर्षातून करण्यात येतो, त्याच लेखाशिर्षातून सदर खर्च भागविण्यात यावा.

३. सदर पदांची सहाव्या व सातव्या वेतन आयोगानुसार वेतननिश्चिती अनुक्रमे शासन निर्णय दि.१२.०८.२००९ व दि.०८.०३.२०१९ मधील तरतुदींनुसार करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९६/सेवा-९, दि.१३.१२.२०२२ व क्र.६२/व्यय-५, दि.२०.०१.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने व मा. मंत्रिमंडळाने दि.०५.०४.२०२३ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०४२५१७४३०४२००८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.04.25 17:49:26 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व परीक्षा), १/ २ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/ २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६. मा.कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
९. कुलसचिव,सर्व अकृषि विद्यापीठे.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२.निवड नस्ती (विशि-१).